विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
कार्यालयातील विमा सहायक संचालक
(गट-अ) पदावर पदोन्नती....
निवडसूची २०२१-२२

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन आदेश क्रमांक : आस्थाप-२०२१/प्र.क्र.५१/विमा प्रशासन,**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ जानेवारी, २०२२

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/ कार्यासन-१२, दि.०१.०८.२०१९

२) वित्त विभाग, अधिसूचना क्र.डीओआय-११८०/सीआर-३६४१/एडीएम-५, दि.२४.०१.१९८३

**-: आदेश :-**

विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील खाली नमूद कनिष्ठ तांत्रिक अधिकारी (गट-ब) (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-१५ : ४१८००-१३२३००) यांना विमा सहायक संचालक (गट-अ) (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-१८ : ४९१००-१५५८००) या पदावर नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त असलेल्या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्याचे नांव | प्रवर्ग | सध्याचे पद | पदोन्नतीनंतरचे पद | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | १ | श्री.गणेश संभू राऊत | अ.ज. | कनिष्ठ तांत्रिक अधिकारी (गट-ब) (राजपत्रित) | विमा सहायक संचालक (गट-अ) | सेवाज्येष्ठतेनुसार पदोन्नती |

२. मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनसार सदर पदोन्नती देण्यात येत आहे. दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयास मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

३. दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील दाखल रिट याचिका स्टँप ६८१९/२०२१, दि.८.७.२०२१ व दि.२२.०७.२०२१ रोजी दिलेल्या आदेशाच्या अधीन सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी पदोन्नत अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५. पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याची विमा संचालनालयाने दक्षता घ्यावी.

६. पदोन्नतीनंतर श्री.ग.सं.राऊत यांची पदस्थापना विमा सहायक संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदावर करण्यात येत आहे.

७. सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत पदोन्नतीच्या पदावरील नियुक्ती न स्वीकारल्यास पदोन्नतीचे आदेश रद्द करण्यात येतील.

८. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेताक २०२२०१२७११३९४०२००५ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK RAMBHAJI DAHIPHALE

Digitally signed by VIVEK RAMBHAJI DAHIPHALE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=56142975484e58364afe88f5f0e3138e3ce0d4e4058e42f003dfd69500064afb, serialNumber=3981a50612646983d580dea2da5fb52a33d8e6e3c4f34cd80f08c598711ceb65, cn=VIVEK RAMBHAJI DAHIPHALE
Date: 2022.01.27 11:41:14 +05'30'

**( वि. रं. दहिफळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) महालेखापाल, (लेखा परीक्षा) १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
४) विमा संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) अवर सचिव, (कार्यासन-१२) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई
७) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई
८) श्री.ग.सं.राऊत, कनिष्ठ तांत्रिक अधिकारी (विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत)
९) निवड नस्ती, (विमा प्रशासन).